**सहायकांच्या सन २०१० मधील सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेसाठी अर्ज पाठविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक :- परीक्षा -१६१०/प्र.क्र.१९/२०१०/१७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ७ जुलै, २०१०.

पहा :- १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सेप्रप्र-१६१०/प्र.क्र.१० /२०१०/१७, दिनांक ७ एप्रिल, २०१०.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सेप्रप्र-१६१०/प्र.क्र.१०/२०१०/१७, दिनांक २१ मे, २०१०.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सेप्रप्र-१६१०/प्र.क्र.१०/२०१०/१७, दिनांक ४ जून, २०१०.
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सेप्रप्र-१६१०/प्र.क्र.१०/२०१०/१७, दिनांक १५ जून, २०१०.

**प रि प त्र क**

मंत्रालयीन विभाग व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कार्यालय, यामधील सहायकांची सन २०१० मधील सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा, ऑगस्ट/सप्टेंबर, २०१० मध्ये घेण्यात येणार आहे. सदर परीक्षेचा निश्चित दिनांक व सविस्तर तपशील यथावकाश जाहीर करण्यात येईल. तद्नुषंगाने चालू वर्षीच्या सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षणासाठी प्रवेश दिलेल्या सहायकांची माहिती, संदर्भाधीन अ.क्र.२ येथील दि.२१ मे, २०१० च्या परिपत्रकानुसार कळविण्यात आली असुन, सध्या त्या सहायकांचे प्रशिक्षण वर्ग सुरु आहेत.

२. आता मंत्रालयीन विभाग व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कार्यालय, यामधील जे सहायक यापूर्वी झालेल्या सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेत अनुत्तीर्ण झालेले आहेत किंवा सदर परीक्षेला अनुपस्थित राहिलेले आहेत अशा सहायकांपैकी ज्या सहायकांना चालू वर्षी होणाऱ्या परीक्षेला पुन्हा बसावयाचे आहे त्या सहायकांचे विहित नमुन्यातील अर्ज, त्याचप्रमाणे प्रशिक्षण न घेता सदर परीक्षेस बसण्यास इच्छुक असलेल्या सहायकांचे विहित नमुन्यातील अर्ज, आपल्या विभागामार्फत प्रमाणित करून या विभागाकडे निश्चितपणे **दिनांक २३ जुलै, २०१० पर्यंत** पाठविण्याची कृपया व्यवस्था करावी.

३. सर्व मंत्रालयीन विभाग व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कार्यालय यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक सर्व संबंधित सहायकांच्या (प्रतिनियुक्तीवर/रजेवर असलेल्या सहायकांसह) कृपया त्वरीत निदर्शनास आणावे व त्यांची स्वाक्षरी घेऊन ते कागदपत्र आपल्या अभिलेखात जतन करुन ठेवावे. यासंदर्भात काही त्रूटी राहिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आपल्या विभागाची राहील याची कृपया नोंद घेण्यात यावी.

सही/-
**( वि.द.आठवले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग ( आस्थापना शाखा),
निवड नस्ती.